उभारणीखालील प्रतिदिन १२५० मे. टन क्षमतेच्या कारखान्यांना रा.स.वि. निगमाकडील वाढीव उभारणी कर्जसहाय्य राज्य शासनामार्फत वितरित करण्याबाबत.

**शरद सहकारी साखर कारखाना मर्यादित, जिल्हा औरंगाबाद.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

शासन निर्णय क्रमांक : ससाका १०१०/०२-रामं/प्र.क्र.०४/३-स

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २९ मार्च,२०११.

**वाचा :-**

१) केंद्र शासन, उपभोक्ता व्यवहार, अन्न धान्य व सार्वजनिक वितरण मंत्रालयाचे कार्यालयीन आदेश क्र.१९४० (ई), दिनांक १० नोव्हेंबर, २००६.

२) शासन निर्णय क्रमांक : ससाका २९०८/प्र.क्र.७८/३-स, दिनांक ५ जुलै, २००८, २ मार्च, २००९ व २४ ऑगस्ट, २००९, ३१ मार्च,२०१० व २९ ऑक्टोबर, २०१०.

३) शासन पत्र समक्रमांक दिनांक २१-१०-२०१० व ७ -१-२०११.

४) रा.स. वि. निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : एनसीडीसी ९-७/२००८- शुगर/ २९८/एसअे-००१६४, दिनांक ४.१.२०११.

५) रा.स. वि. निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : एनसीडीसी ९-७/२००८- शुगर/४४९/ आरअे-००४२३, दिनांक २.२.२०११.

६) रा.स. वि. निगम, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : एनसीडीसी /अे ॲण्ड सी /९(१)/ रिलीज /०९, दिनांक ७.२.२०११.

७) वित्त विभागाचे परिपत्रक पूरक २०१०/प्र.क्र.२४०/अर्थसंकल्प-३,दिनांक ३० डिसेंबर,२०१०.

**प्रस्तावना :**

दिनांक १२ जून, २००८ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत उभारणीखालील प्रतिदिन १२५० मे.टन गाळप क्षमतेच्या शरद सहकारी साखर कारखाना म., औरंगाबाद, भाऊसाहेब बिराजदार सहकारी साखर कारखाना म., उस्मानाबाद, बाणगंगा सहकारी साखर कारखाना म., उस्मानाबाद, छत्रपती सहकारी साखर कारखाना म., बीड, संत कुर्मदास सहकारी साखर कारखाना म., सोलापूर, टोकाई सहकारी साखर कारखाना म., हिंगोली व शिवशक्ती सहकारी साखर कारखाना म., उस्मानाबाद या ७ सहकारी साखर कारखान्यांना त्यांच्या आकृतिबंधात बदल न करता व शासकीय भागभांडवलाचे प्रमाण पूर्वीइतकेच ठेवून रु. २८.०० कोटीच्या मर्यादेत प्रत्येकी रु. १६.८० कोटी प्रमाणे कर्ज उभारण्याकरीता रुपये ११७.६० कोटी कर्ज रुपाने रा.स. वि. निगमकडून घेऊन ते राज्य शासनामार्फत संबंधित साखर कारखान्यांना कर्ज म्हणून उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला

आहे. त्यानुसार याबाबतचा प्रस्ताव एनसीडीसीकडे पाठविण्यात आला. सदर प्रस्तावास एनसीडीसीने मान्यता देऊन वेळोवेळी वरीलप्रमाणे प्रत्येकी रु. १६.८० कोटी कर्ज सहाय्य शिवशक्ती सहकारी साखर कारखाना कोळसूर, उस्मानाबाद वगळता उर्वरीत ६ सहकारी साखर कारखान्यांना मंजूर केले आहे. सदर कर्ज सहाय्य संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये संबंधित कारखान्यांना वितरीत करण्यात आले आहे.

दिनांक ६ ऑक्टोबर, २०१० रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत शरद सहकारी साखर कारखान्यास जुन्या यंत्रसामुग्रीचे पार्टस् बदलण्याकरिता व पाणीपुरवठा योजना कार्यान्वित करण्यासाठी रु.३४५.०४ लाख एवढे वाढीव कर्जसहाय्य एनसीडीसीकडून घेऊन ते राज्य शासनामार्फत उपलब्ध करुन देण्याबाबत एनसीडीसीकडे शिफारस करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार या प्रकरणी संदर्भ क्र.३ येथील दिनांक २१-१०-२०१० च्या पत्रान्वये एनसीडीसीकडे प्रस्ताव पाठविण्यात आला. सदर प्रस्तावास एनसीडीसीने संदर्भ क्र.४ येथील दिनांक ४-१-२०११ च्या पत्रान्वये मान्यता दिली असून संदर्भ क्र.५ येथील दिनांक २-२-२०११ च्या पत्रान्वये कर्जसहाय्य रु.३४५.०४ लाख मंजूर केले आहेत. एनसीडीसीने मंजूर केलेले सदर वाढीव कर्जसहाय्य शरद सहकारी साखर कारखाना, औरंगाबाद यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय सहकारी विकास निगम नवी दिल्ली यांनी दि.२.२.२०११ च्या पत्रान्वये शरद सहकारी साखर कारखाना मर्यादित, औरंगाबाद या कारखान्यास जुन्या यंत्रसामुग्रीचे पार्टस् बदलण्याकरिता व पाणीपुरवठा योजना कार्यान्वित करण्यासाठी रु.३४५.०४ लाख (रुपये तीन कोटी पंचेचाळीस लाख चार हजार फक्त) एवढे वाढीव कर्जसहाय्य मंजूर केले आहे.

२. सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पात उपरोक्त बाबीसाठी खालील लेखाशीर्षाखाली रु.४१,००,००,०००/- व डिसेंबर, २०१० च्या अधिवेशनात पुरक मागणीद्वारे रु.२४,५३,८९.०००/- एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. अशा प्रकारे या बाबीसाठी एकूण रु.६५,५३,८९,०००/- एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

मागणी क्रमांक व्ही-५,
६४२५-सहकारासाठी कर्जे,
१०८- इतर सहकारी संस्थांना कर्जे,
(०३) (०५) सहकारी साखर कारखान्यांच्या आधुनिकीकरणासाठी व विस्तारीकरणासाठी कर्जे (रा.स. वि.म.) (६४२५ ०६०९)
५५, कर्जे व आगाऊ रकमा.

सदर तरतूदीतून उभारणीखालील शरद सहकारी साखर कारखान्यास एनसीडीसीने मंजूर केलेले कर्जसहाय्य रक्कम रु.३,४५,०४,०००/- पैकी रु.३,४५,००,०००/- (रुपये तीन कोटी

पंचेचाळीस लाख फक्त) एवढे वाढीव कर्जसहाय्य वितरित करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) या प्रकरणी एनसीडीसीकडील दि.४-१-२०११ च्या पत्रातील व पत्रासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अटी जशाच्या तशा लागू राहतील.

२) या प्रकरणी रा.स. वि. निगमाकडील पत्र क्रमांक १-१/८४- बजेट दिनांक १५/१०/८४ व क्रमांक एनसीडीसी १-१/९०/बजेट, दिनांक १४/११/२००८ मध्ये नमूद केलेल्या अटी जशाच्यातशा लागू राहतील तसेच रा.स. वि. निगमामार्फत वेळोवेळी सुधारित करण्यात येणा-या अटी व शर्ती संबंधित कारखान्यावर बंधनकारक राहतील.

३) प्रकल्पामध्ये नमूद करण्यात आलेल्या भांडवली खर्चाव्यतिरिक्त अन्य भांडवली खर्च रा.स.वि. निगमाच्या पूर्व मान्यतेशिवाय संस्थेस करता येणार नाही. कर्ज फेडीच्या कालावधीमध्ये कारखान्याने गाळप केलेल्या ऊसावर प्रतिटन रुपये २५/- प्रमाणे विनापरतीच्या ठेवी रा.स.वि. निगमकडे जमा कराव्यात. सदर ठेवीवर व्याज देय राहणार नाही.

४) कर्जाची परतफेड विहित मुदतीत करण्याची प्रथम जबाबदारी संबंधित कारखान्याची राहील.

५) या कर्जापोटी संबंधित कारखान्याने स्थावर व जंगम मालमत्तेचे गहाणखत शासनास करुन दयावे. तसेच, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील कलम १५५ मधील तरतूदीनुसार सदर साखर कारखान्यांकडील शासनास देय असलेल्या सर्व रकमा जमिन महसूलाची थकबाकी वसूल करण्यासाठी त्यावेळी व जो कायदा व जे नियम अंमलात असतील, त्या कायदयानुसार व त्या नियमान्वये वसूली करण्यात यावी.

६) सदर रक्कमेचा विनियोग ज्या कारणासाठी सदर रक्कम मंजूर करण्यात येत आहे, त्याच कारणासाठी खर्च करण्याबाबत साखर आयुक्तांनी योग्य ती दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त बाबीवरील होणारा खर्च सन २०१०-११ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक व्ही-५,<br>
६४२५-सहकारासाठी कर्जे,<br>
१०८- इतर सहकारी संस्थांना कर्जे,<br>
(०३) (०५) सहकारी साखर कारखान्यांच्या आधुनिकीकरण व विस्तारीकरणासाठी कर्जे<br>
(रा.स. वि. म.) (६४२५ ०६०९)<br>
५५, कर्जे व आगाऊ रकमा

५.  वाढीव कर्ज सहाय्यापोटी मंजूर करण्यात आलेल्या **रु.३,४५,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पंचेचाळीस लाख फक्त)** इतक्या रक्कमेचे आहरण करुन संवितरण करण्याकरिता श्री. य.गं.पाटील, कार्यासन अधिकारी, रोख शाखा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री. गो.ना.रणखांबे, सहसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२ यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून सदर रक्कमेचे आहरण करुन खालील सहकारी साखर कारखान्याच्या नावे त्यांच्यासमोर दर्शविलेल्या रक्कमेएवढा धनादेश काढावा :-

| अ.क्र. | कारखान्याचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| १ | **शरद सहकारी साखर कारखाना मर्यादित, औरंगाबाद**<br>Sharad Sahakari Sakhar Karkhana Ltd., Dist.Aurangabad. | ३,४५,००,०००/-<br>3,45,00,000/- |

६.  या प्रकरणी साखर आयुक्त यांनी कारखान्याकडून स्थावर व जंगम मालमत्तेचे गहाणखत शासनाच्या नावे करुन घ्यावे. तसेच लोन ॲग्रीमेंटही संबंधित कारखान्यांकडून करुन घ्यावे. उपरोक्त रक्कमेचा विनियोग कारखाना आवश्यक त्या बाबीकरिताच करीत आहे. या बाबीचे नियंत्रण संबंधित बँकांमार्फत साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा. तसेच उपरोक्त रकमेचे विनियोग प्रमाणपत्र साखर आयुक्तालयामार्फत शासनास सादर करावे.

७.  सदर कर्जाच्या परतफेडीच्या मुद्दल व व्याजाची रक्कम खालील लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी :-

<u>मुद्दल -</u> मागणी क्रमांक व्ही-५,
६४२५-सहकारासाठी कर्जे,
१०८- इतर सहकारी संस्थाची कर्ज,
(०३) (०५) सहकारी साखर कारखान्यांच्या आधुनिकीकरण व विस्तारीकरणासाठी कर्जे (रा.स. वि. म.) (६४२५ ०६०९)
५५, कर्जे व आगाऊ रकमा

<u>व्याज -</u> मुख्य लेखाशीर्ष, ००४९ - व्याजाच्या जमा रकमा
१९५, सहकारी संस्थांकडून व्याज
(०१) (०९) सहकारी साखर कारखाने (००४९१२०१)

वरीलप्रमाणे कर्ज व व्याजाची रक्कम विहित मुदतीत जमा केल्याचे चलन संबंधित सहकारी साखर कारखान्याने साखर आयुक्तालयामार्फत शासनास जमा करावे.

८. या बाबीसाठी सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पात एकूण रु. ६५,५३,८९,०००/-एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर खर्च झाल्यानंतर या लेखाशीर्षाखाली रु.३८,५१,८०४/- एवढी तरतूद शिल्लक राहील.

९. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११०/११/व्यय-२, दिनांक ४.३.२०११ व अनौपचारिक संदर्भ क्र.३९३/११/अर्थ-१३, दिनांक २५.३.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३२९११२२३९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( पां. स. देवकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई /नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर.
३. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. कार्यासन अधिकारी, रोख शाखा, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
६. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मादाम कामा रोड, मंत्रालयासमोर मुंबई-३२.
७. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२/ अर्थोपाय/अर्थसंकल्प -३ व १३ ).
८. कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (१७ स /२१ स).
९. वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
१०. संचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ४, सिरी इन्स्टिटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली ११० ००१.
११. प्रादेशिक उपसंचालक, राष्ट्रीय सहकार विकास निगम, ५- बी.जे. रोड, पुणे.
१२. कार्यकारी संचालक, शरद सहकारी साखर कारखाना म., प्रतिभानगर, विहामांडवा, ता.पैठण, जिल्हा औरंगाबाद.
१३. प्रादेशिक सहसंचालक (साखर), औरंगाबाद.
१४. निवड नस्ती, कार्यासन क्र.३-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग.